UD-9we

**प्रादेशिक योजना - अहमदनगर**

मौजे साकुरी तालुका राहता येथील गट क्र. ४३८(भाग) मधील क्षेत्र कृषी विभागातून वगळून रहिवास विभागात समाविष्ट करणेबाबत, महाराष्ट्र प्रादेशिक नियोजन व नगर रचना अधिनियम, १९६६ चे कलम २०(४) अन्वये अधिसूचना

**महाराष्ट्र शासन**

नगर विकास विभाग

शासन निर्णय क्र. टिपीएस-१६०५/६००/प्र.क्र.२/०६/नवि-९

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

दिनांक: २६ ऑगस्ट, २००९

**शासन निर्णय** :- सोबतची अधिसूचना (मराठी व इंग्रजी) महाराष्ट्र शासन राजपत्रात प्रसिध्द करण्यात यावी.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने**

**(प्रदीप गोहिल )**
**कार्यासन अधिकारी**

**प्रति,**

१) विभागीय आयुक्त, नाशिक विभाग, नाशिक.
२) संचालक नगररचना, महाराष्ट्र राज्य, पुणे.
३) जिल्हाधिकारी, अहमदनगर.
४) उपसंचालक नगररचना, नाशिक विभाग, नाशिक.
(त्यांना विनंती करण्यात येते की, प्रस्तुत अधिसूचनेतील प्रस्तावित बदल दर्शविण्याऱ्या नकाशाच्या पाच प्रती अधिप्रमाणित करणेसाठी शासनास सत्वर सादर कराव्यात.)
५) सहायक संचालक नगररचना, अहमदनगर शाखा, अहमदनगर.
६) व्यवस्थापक, येरवडा कारागृह मुद्रणालय व ग्रंथागार, पुणे.
(त्यांना विनंती करण्यांत येते की, सोबतची अधिसूचना महाराष्ट्र शासनाच्या राजपत्रात नाशिक विभाग, भाग-एक पुरवणीमध्ये प्रसिध्द करण्यात येवून त्याच्या प्रत्येकी ५ प्रती या विभागास व संचालक नगररचना, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्याकडे पाठवाव्यात)
८) कक्ष अधिकारी (नवि-२९), नगर विकास विभाग , मंत्रालय, मुंबई.
(त्यांना विनंती करण्यांत येते की, सोबतची अधिसूचना महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर प्रसिध्द करावी.)
९) निवडनस्ती (कार्यासन-नवि-९).

**प्रादेशिक योजना - अहमदनगर**

महाराष्ट्र प्रादेशिक नियोजन व नगर रचना अधिनियम, १९६६ चे कलम २०(३) अन्वये फेरबदलाची सूचना

**अधिसूचना**
**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग,**
**मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.**
**दिनांक : २६ ऑगस्ट, २००८**

***महाराष्ट्र प्रादेशिक व नगर रचना अधिनियम, १९६६***

**क्रमांक टिपीएस-१६०५/६००/प्र.क्र.२/०६/नवि-९**:- ज्याअर्थी अहमदनगर प्रादेशिक योजना (यापुढे "उक्त प्रादेशिक योजना" असे संबोधिले आहे) शासन अधिसूचना क्र. टिपीएस-१६००/९३२/प्र.क्र.३२/२००३(भाग-१)/नवि-९, दिलांक १४ जुलै, २००५ अन्वये मंजूर झाली असून ती दिनांक १ ऑक्टोबर, २००५ पासून अंमलात आलेली आहे ;

आणि ज्याअर्थी, मौजे साकुरी तालुका राहता हे गांव उक्त प्रादेशिक योजनेत समाविष्ट असून उक्त प्रादेशिक योजनेच्या मौजे साकुरी येथील गट क्र. ३११, ४३८(भाग), ४४२(भाग) व ४९४ मधील क्षेत्र कृषी विभागात समाविष्ट आहे (यापुढे "उक्त क्षेत्र" असे संबोधिले आहे) ;

आणि ज्याअर्थी, महाराष्ट्र प्रादेशिक नियोजन व नगररचना अधिनियम, १९६६ (सन १९६६ चा महाराष्ट्र ३७ वा) (यापुढे "उक्त अधिनियम" असे संबोधिलेले आहे) च्या कलम २० चे पोटकलम (२) मधील तरतुदीनुसार उक्त प्रादेशिक योजनेमधील उक्त क्षेत्र कृषी विभागातून वगळून रहिवास विभागात समाविष्ट करणे आवश्यक असल्याबाबत शासनाचे मत झाले आहे (यापुढे "उक्त प्रस्तावित फेरबदल" असे संबोधिले आहे);

आणि ज्याअर्थी उक्त अधिनियमाच्या कलम-२० चे पोटकलम (३) च्या तरतुदीनुसार शासन अधिसुचना नगर विकास विभाग क्र. टिपीएस-१६०५/६००/प्र.क्र.२/०६/नवि-९, दिनांक १ एप्रिल, २००६ अन्वये उक्त प्रस्तावित फेरबदलाबाबत सर्व संबंधितांकडून विहित मुदतीत सुचना / हरकती दाखल करणा-यांना सुनावणी देण्याकरिता व शासनास अहवाल सादर करण्याकरिता "अधिकारी" म्हणून उपसंचालक नगररचना, नाशिक विभाग, नाशिक यांची नियुक्ती करण्यात आली होती (यापुढे "उक्त अधिकारी" असे संबोधले आहे);

आणि ज्याअर्थी, उक्त अधिका-यांच्या प्राप्त अहवालावर संचालक नगर रचना, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचा सल्ला घेतल्यानंतर उक्त प्रस्तावित फेरबदलास काही बदलांसह व काही अटींसह मान्यता देणे आवश्यक असल्याचे शासनाचे मत झाले आहे ;

आता त्याअर्थी, उक्त अधिनियमाचे कलम २० चे पोटकलम (४) व त्याअनुषंगाचे प्राप्त अधिकारात शासन उक्त प्रस्तावित फेरबदलांतर्गत गट क्र. ३११, ४४२(भाग) व ४९४

खालील क्षेत्राचा फेरबदल अमान्य करणे व गट क्र. ४३८(भाग) फेरबदलास खालील प्रमाणे सशर्त मंजूरी देत आहे आणि त्यासाठी उक्त प्रादेशिक योजना मंजुरीची दिनांक १४, जुलै, २००५ ची अधिसूचना सुधारित करण्यात येत आहे.

उक्त प्रादेशिक योजना मंजूरीच्या अधिसूचनेसोबत जोडलेल्या फेरबदलाच्या अनुसूचितील शेवटच्या नोंदीनंतर पुढील नव्या नोंदीचा समावेश करण्यात येत आहे.

## नोंद

"मौजे साकुरी तालुका राहता येथील गट क्र. ४३८(भाग) मधील क्षेत्र कृषी विभागातून वगळून खालील अटीस अधिन राहून नकाशात दर्शविल्याप्रमाणे रहिवास विभागात समाविष्ट करण्यात येत आहे."

**अट:-** फेरबदलाखालील क्षेत्रावर, अभिन्यास करताना १०% अनिवार्य (नियमानुसार लागू) खुल्या जागे व्यतिरिक्त, १०% अतिरिक्त क्षेत्र सार्वजनिक सुविधांसाठी सोडणे आवश्यक राहील.

**टिप-**

**(क)** उक्त मंजुर फेरबदल दर्शविणारा भाग नकाशा नागरिकांच्या अवलोकनार्थ कार्यालयीन कामकाजाच्या दिवशी कार्यालयीन वेळेमध्ये खाली नमूद केलेल्या कार्यालयामध्ये एक महिन्याच्या कालावधीसाठी ठेवण्यात आला आहे.

१) जिल्हाधिकारी, जिल्हा अहमदनगर.

२) उपसंचालक नगर रचना, नाशिक विभाग, नवीन प्रशासकीय इमारत, आयुक्त, कार्यालय इमारत, नाशिक रोड, नाशिक.

३) सहायक संचालक नगर रचना, अहमदनगर शाखा, अहमदनगर

**(ख)** सदर फेरबदलाची अधिसुचना विभागाच्या www.urban.maharashtra.gov.in या वेबसाईटवर देखील उपलब्ध आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

**(प्रदीप गोहिल)**
**कार्यासन अधिकारी**

**Regional Plan - Ahmadnagar**

Notification under section 20 (4) of the Maharashtra Regional & Town Planning Act, 1966

**Government of Maharashtra**
**Urban Development Department**
**Mantralaya, Mumbai 400 032.**
**Dated: 26th August, 2009**

**NOTIFICATION**

***The Maharashtra Regional & Town Planning Act, 1966***

**No.TPS-1605/600/CR-2/06/UD-9:** Whereas the Ahmadnagar Regional Plan (hereinafter referred to as the "said Regional Plan") has been sanctioned by Government vide Urban Development Department's Notification No. TPS-1600/932/CR-32/2003 (Part-1)/UD-9, dated 14th July, 2005 and which has came into force with effect from 1st October, 2005 ;

And whereas Mauje Sakuri Taluka Rahata is included in the said Regional Plan and as per the proposal of the said Regional Plan, land bearing Gut Nos. 311, 438(pt), 442(pt) & 494 of Mauje Sakuri is shown in "Agricultural Zone' (hereinafter referred to as "the said Land") ;

And whereas, the Government of Maharashtra is of the opinion that the said Land should be deleted from Agricultural Zone and included in Residential Zone (hereinafter referred to as "the said Modification") as provided in sub section (2) of section 20 of the Maharashtra Regional & Town Planning Act, 1966 (Mah. XXXVII of 1966) (hereinafter referred to as "the said Act") ;

And whereas the Notice for the said Modification under the power conferred by section 20(3) of the said Act, has been published inviting suggestion / objections from concerned, and the Deputy Director of Town Planning, Nashik Division, Nashik has been appointed as "an officer" by Government vide Urban Development Department Notification No. TPS-1605/600/CR-2/06/UD-9, dated 1st April, 2006 to hear suggestions / objections received within stipulated period and submit his report to Government (hereinafter referred to as "the said Officer") ;

And whereas, after consulting the Director of Town Planning, Maharashtra State, Pune on the report submitted by the said Officer, Government is of the opinion that the said Land should be deleted from Agricultural Zone and included in Residential Zone with some changes subject to some conditions ;

Now, therefore, in exercise of the power conferred under sub section (4) of section 20 of the said Act, Govt. hereby refuses to sanction the modification regarding Gut No. 311, 442(pt) & 494 & sanctions the said Modification regarding Gut No. 438(pt) with some conditions and for that purpose amends the above Notification dated 14th July, 2005 sanctioning the said Regional Plan as follows ;

In the Schedule of Modification appended to the Notification sanctioning the said Regional Plan, following new entry shall be added after the last entry -

**ENTRY**

"The land bearing Gut No. 438(pt) of mouje Sakuri is deleted from Agricultural Zone and lands so released are included in Residential zone as shown on the plan subject to the following condition".

**Condition:-** While laying out the land under modification, in addition to 10% compulsory open space, 10% public amenity space should be kept.

**Note - A)** The copy of part plan showing the abovesaid sanctioned modification is kept open for inspection by the public during office hours on all working days for a period of one month at the following offices:-

(1) The Collector of Ahmadnagar
(2) The Deputy Director of Town Planning, Nashik Division, Nashik, New Administrative Bldg. Commissioner Office compound, Nashik Road, Nashik.
(3) The Assistant Director of Town Planning, Ahmednagar Branch, Ahmednagar.

**B)** This Notification is also available on Department's web site No. www.urban.maharashtra.gov.in.

**By order and in the name of the Governor of Maharashtra,**

**( Prdeep Gohil )**
**Section Officer**

Adhisuchna A'nagar 20(4)